**शासकीय सेवेतील अपंग कर्मचाऱ्याची बदली त्याच्या राहत्या ठिकाणाजवळ करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : अपंग-१००४/प्र.क्र.१८/०४/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५.१२.२००४.

संदर्भ : १) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०८५/१४७/सीआर-७४/१६-अ, दि.७.१०.१९८७.
२) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक : अपंग-१००४/प्र.क्र.१८/०४/१६-अ, दि.१५.४.२००४.

**शासन परिपत्रक :-**

शासकीय सेवेतील अपंग कर्मचाऱ्यांच्या बदल्या सहानुभूतीचा दृष्टीकोन ठेऊन त्यांच्या राहत्या ठिकाणाजवळ करण्याबाबत संदर्भाधीन क्र.१ च्या परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या होत्या. तथापि या सूचनांची व्यवस्थित अंमलबजावणी होत नाही असे निदर्शनास आल्यामुळे संदर्भाधीन क्र.२ च्या परिपत्रकान्वये, मंत्रालयीन विभाग व त्यांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांना पुन्हा सूचना देण्यात आल्या होत्या की, शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी शासनाने दि.१६ जानेवारी २००४ रोजी प्रख्यापित केलेल्या अध्यादेशास अधीन राहून शासकीय सेवेतील अपंग कर्मचाऱ्यांच्या बदल्या प्रशासकीय सोयीनुसार शक्य असल्यास त्यांच्या राहत्या ठिकाणाजवळ कराव्यात.

आता या अनुषंगाने सुधारित सुचना देण्यात येत आहेत की, शासकीय सेवेतील अपंग कर्मचाऱ्यांच्या बदल्या, शासनाने दि.१६.१.२००४ रोजी तसेच दिनांक २ जुलै २००४ रोजी प्रख्यापित केलेले अध्यादेश / बदल्यांचे नियम, यातील तरतुदींस बाधा येणार नाही या अटीचे अधीन राहून त्यांच्या राहत्या ठिकाणाजवळील कार्यालयात पदांची उपलब्धता आणि प्रशासकीय सोय लक्षात घेवून करता येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( दे.त्र्यं.कुमावत )
शासनाचे उप सचिव.

प्रति,

१.राज्यपाल यांचे सचिव,
२.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
४.सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५.मुख्य सचिव,
६.शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव,
७.*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
८.*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
९.*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
१०.*प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त, मुंबई,
११.*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१२.*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१३*सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१४.सर्व विभागीय आयुक्त,
१५.राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
१६.सर्व जिल्हाधिकारी,
१७.सर्व महापालिकांचे आयुक्त,
१८.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१९.सर्व मुख्याधिकारी, नगर परिषदा/नगरपालिका,
२०.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई,
२१.अवर सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२२. आयुक्त, अपंग कल्याण, ३, चर्च रोड, पुणे,
२३.सर्व मंत्रालयीन विभाग,
२४.मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
२५.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२६.निवड नस्ती.

---

रोटा/एच-789(4500-12-2004).